# मेहनती टोनी



एलन आर्किने

चित्र : जेम्स स्टीवेन्सन

मराठी : अश्विनी बर्वे

शहराच्या बाहेर असणारे घर ठीक करण्याची गरज आहे. वडील हातोडी मारत आहेत, आई शिवणकाम करत आहे, मॅथ्यु पेंटीग करत आहे.अॅडम लाकडं फोडत आहे. पण टोनी काहीच काम करत नाही, ते त्याला मदत करू देत नाहीत. “तू अजून खूप छोटा आहेस,” ते सगळे म्हणत – कमीत कमी ते असाच विचार करतात.

मग टोनी जंगलात फिरायला जातो आणि निश्चय करतो की तो आता फक्त स्वतःसाठी काम करणार.आणि मग तो तसेच करतो-माती आणि पाणी, पानं आणि घास, झाडं आणि खडे आणि दगडांच्या बरोबर टोनी पूर्ण दिवस काम करतो.आणि तो जे करतो त्याने कदाचित वाचक जितके प्रसन्न होतील तितके त्याने त्याच्या कुटुंबाला उत्साहित केलं.

# मेहनती टोनी









टोनीच्या आईवडीलानी शहराच्या बाहेर एक घर घेतले. ते एक छोटंस घर होतं पण त्याची खूप मोडतोड झालेली होती. पण टोनीच्या वडिलांना ते आवडलं कारण तिथं जवळ हिरवा चार, गोड पाणी आणि स्वच्छ हवा होती. जिथं तुम्ही दिवसभर मोकळा श्वास घेवू शकतात.

“ज़रा हवेचा सुंगध घे!” टोनीचे वडील म्हणत आणि मग कोणी आपलं काम सोडून जोरजोरात श्वास घेत असे.

त्या घरात खूप काम बाकी होतं. पेंटिंग आणि सफाईचे काम, पडदे लावणे, कोळ्याची जाळी साफ करणे, हातोडीने खिळे ठोकणे आणि अशा अनेक गोष्टी.

“मला पण मदत करू द्या,” टोनी आपल्या वडिलांना म्हणाला, “मला हातोडी वापरू द्या”

“नाही, तू अजून छोटा आहे,”टोनीचे वडिलांनी उत्तर दिलं. “तू हातोडीने स्वतःला जखमी करशील,आणि मग तू रडशील.मग आम्हांला सगळ्यांना आमचं काम बंद करून थोड्यावेळ तुला सांभाळावं लागेल. म्हणून तू हे काम करणं योग्य होणार नाही.”

“मला मदत करू द्या!” टोनीने आपल्या आईला सांगितले, जी पडदे शिवत होती.

“आत्ता नाही,” टोनीची आई म्हणाली, “कारण मी सुईने छोटे-छोटे टाके घालत आहे, आणि तुझा हात इतके बारीक काम करू शकणार नाही. आणि जर सुई टोचली तर तुझ्या हातातून थोडसे रक्त निघेल. तू रक्ताला घाबरतो आणि मग तू रडशील. मग आम्हांला सर्वांना आमचे काम बंद करून तुला गप्प करावं लागेल आणि तुझ्यासाठी गाणं म्हणावं लागेल. म्हणून ही चांगली कल्पना नाही.”





"मला मदत करू दे," टोनी आपल्या मोठ्या भावाला मॅथ्युला म्हणाला, जो आपल्या खोलीला एका मोठ्या ब्रशने रंगवत होता.

"नाही," मॅथ्यू म्हणाला. "तुला पेंट करता येत नाही. तू रंग फरशीवर सांडशील आणि मग मला राग येईल आणि मी तुझ्यावर ओरडेन. मग तू रडशील आणि धावत धावत आईजवळ जाशील आणि मग आई तुला विचारेल काय झालं? तू तक्रार करशील की मॅथ्यू खूप मतलबी आहे. आई हे वडिलांना सांगेल आणि मग डॅडी माझ्यावर ओरडतील. म्हणून तू इथं काम करणं योग्य होणार नाही.

"मला मदत करू दे," टोनी आपल्या दुसऱ्या मोठ्या भावाला एडमला म्हणाला. एडम लाकडं फोडत होता.

"नाही," एडम म्हणाला. "ही कुऱ्हाड खूप जड आहे आणि तू ती उंच उचलू शकणार नाही, आणि मग ती वेगाने तुझ्या पायावर पडेल आणि मग तू ओरडशील आणि दहा मिनिटे इकडेतिकडे उड्या मारशील. म्हणून हे काम तुझ्या योग्य नाही."

"मग मला करण्यासाठी कोणतं काम चांगलं असेल?" टोनीने आपल्या भावाला विचारलं.

एडमने विचारलं, "तुझ्यासाठी एकच काम चांगलं आहे. तू एखाद्या अशा जागेवर जाऊन खेळ जिथं कोणाला तुझ्या त्रास होणार नाही."



ठीक आहे," टोनी म्हणाला. आणि तो चालत एक मोठ्या डोंगरावर गेला, “मी इथं माझं स्वतःच घर बांधेन” तो म्हणाला.



मग टोनीने जमिनीत खड्डा खणला. तो त्याने खडे आणि दगडांनी भरला आणि मोठ्या कष्टाने तो गुळगुळीत केलं. मग एकदम सपाट झाला. “ही माझी फरशी होईल,” टोनी म्हणाला..

त्यानंतर टोनीने एक टोकदार दगड आणि लाकडाच्या तुकड्याने कुऱ्हाड तयार केली.

“माझ्या घराच्या भिंतीसाठी मी काही झाडं तोडतो.”

मग त्याने काही झाडं तोडली आणि फांद्यांना चांगलं सोललं. त्यापासून त्याने खांब बनवले. मग त्याने त्या फांद्याचे वरचे टोक कापून सपाट केले. म्हणजे त्या-एक दुसऱ्याबरोबर फिट होतील. त्याने त्या खांबांना दगडाच्या फरशीवर पसरवलं. मग त्याने आपल्या घराच्या भिंती तयार करण्यासाठी ते खांब एक दुसऱ्यावर ठेवले.



पण लवकरच भिंत एवढी उंच झाली की तो एवढ्यावर पोहचू शकत नव्हता, म्हणून तो शिडी आणायला घरी गेला.

“आता मी भिंतीच्यावर पोहचू शकेल,” तो म्हणाला.

टोनीने आपल्या घराच्या भिंतीचे काम पूर्ण केले आणि मग छत करण्यासाठी त्याने अजून झाडं तोडली.

त्याने भिंतीवर एक झाडाचा खांब दुसऱ्याच्या जवळ ठेवला. मग छत करण्यासाठी तो जंगलात वेली आणायला गेला.



त्याने वेलीची पाने ओढून तोडली. मग त्याला एक लांब दोरी सापडली जिच्या साहय्याने त्याने ते खांब एकत्र बांधले.

मग त्याने ओली माती छतावर टाकली त्यामुळे घराच्या आत पावसाचे पाणी येणार नाही.



मग त्याने कुऱ्हाडीने भिंतीला मोठमोठी भोकं पाडली, “या माझ्या खिडक्या असतील,” टोनी म्हणाला.

खिड़क्याचे काम संपल्यावर टोनी दुपारच्या जेवणासाठी घरी गेला. एवढं काम केल्यावर त्याला खूप भूक लागली होती. म्हणून त्याने पाच सैंडविच खाल्ले आणि सात ग्लास दूध प्यायला.

“तू सकाळपासून काय करत आहेस?” टोनीच्या वडिलांनी विचारलं.

“मी डोंगरावर एक खेळ खेळत आहे,” टोनी म्हणाला. मग तो कामाकडे परत गेला.



त्याने एक हजार दगड आणले आणि ते त्याने घरात एक-दुसऱ्यावर टाकले. आणि जेव्हा ते छता पर्यंत पोहचले तेव्हा तो छतावर पोहचला आणि तिथं त्याने एक मोठं भोक पाडलं, ज्यातून तो धुराड बाहेर काढू शकणार होता.



"इथं माझं धुराडे असेल," टोनी म्हणाला.
मग त्याने सगळ्या दगडांच्या मध्ये माती भरली,
ज्यामुळे धुराडे पक्की बसेल.



गवताच्या मैदानात उगवणारे काही लांब गवत त्याला सापडले. त्याने आपल्या घरासाठी एक मोठा गालिचा निवडला. ज्यामुळे आपण चप्पल काढल्यावर पायाला थंड लागणार नाही.

मग त्याने थोडी झोप काढली कारण त्याने दिवसभर कष्ट केल्याने तो थकून गेला.



जेव्हा तो झोपेतून उठला तेव्हा पूर्ण परिवार त्याच्या समोर उभा होता.

“आम्ही तुला सगळीकडे शोधलं,,” त्याची आई म्हणाली.

“मी झोपलो होतो.” टोनी म्हणाला.



“हे सुंदर घर कोणी बांधले?” टोनीच्या वडिलांनी विचारलं.

“मी बांधलं,” टोनी म्हणाला. “आणि ते खूप कठीण काम होतं. त्यात माझा पूर्ण दिवस गेला.

“ही राहण्यासाठी एक चांगली जागा आहे,” एडम म्हणाला.

“आपण या घरात राहू शकतो का?” मॅथ्यूने विचारलं.

"ज़रूर," टोनीने उत्तर दिलं.



मग कुटुंबाने सगळी अंथरुणे आणि भांडी टोनीने बांधलेल्या घरात आणली. आणि ते इतके खुश होते की त्यांनी कायमस्वरूपी इथं राहण्याचा निर्णय घेतला. मग घरात जर काही काम असेल तर ते टोनीला विचारत, “तू काय मदत करू शकशील?”

आणि टोनी नेहमी म्हणे, “हो”

समाप्त